**मौजा अंबाझरी, जिल्हा नागपूर येथील खसरा क्र. १ नगर भुमापन क्र. १ मधील ४४ एकर शासकीस जमीन पर्यटन विकास व देखभालीकरीता महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित यांना भाडेपट्ट्यावर देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जमीन-२०१५/प्र.क्र.२९९/ज-८**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, १ ला मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २१.०७.२०१७

**संदर्भ :-** १. विभागीय आयुक्त, नागपूर यांचे क्र.जमीन/कक्ष८(१)/सीआर-१७/२०१५/कावी-४९०, दि. २१.०८.२०१५ चे पत्र.
२. महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित यांचे क्र. मपविम/ जवमा/ अंबाझरी/ २०१७/६५८, दि.०६.०२.२०१७ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

मौजा अंबाझरी तलाव परिसरातील ४४ एकर शासकीय जमिनीपैकी १९ एकर व तलावाची पाळ असलेली ६ एकर जमीन अशी एकुण २५ एकर जमीन नागपूर महानगरपालिकेमार्फत व उर्वरित १९ एकर जमीन महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित यांच्यामार्फत विकास करण्यासाठी शासन परिपत्रक दि. ०२.०७.२०१४ मधील तरतुदीनुसार महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित यांना नाममात्र रु. १/- दराने भाडेपट्ट्याने देण्याबाबत विभागीय आयुक्त, नागपूर यांनी संदर्भ क्र.१ अन्वये शासनास प्रस्ताव सादर केला होता.

मौजा अंबाझरी, जिल्हा नागपूर येथील खसरा क्र. १ नगर भुमापन क्र. १ या शासकीय जागेचे क्षेत्र ३६.४१ हे.आर असून त्या जागेचे व्यवस्थापन नागपूर महानगरपालिकेकडे आहे. उक्त जागेपैकी ४४ एकरावरील अंबाझरी उद्यानाचा विकास करण्यासाठी दि.२२.०४.२०१५ रोजी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित यांनी आयोजित केलेल्या बैठकीच्या अनुषंगाने विभागीय आयुक्त यांनी उपरोक्त प्रस्ताव सादर केला होता.

विभागीय आयुक्त, नागपूर यांच्या सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने नागपूर महानगरपालिकेच्या सभागृहात दिनांक ०६.१०.२०१६ रोजी ठराव होऊन या दोन्ही जागेच्या विकासानंतर प्राप्त नफ्याची वाटणी नागपूर महानगरपालिकेस ७५ टक्के व महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित यांना २५ टक्के ठेवण्यास सभागृहाने एकमताने मान्यता प्रदान केली आहे.

सदर प्रस्तावाधिन विकसित करावयाची जमीन महाराष्ट्र शासनाच्या मालकीची असून सध्या ती केवळ व्यवस्थापनाकरिता नागपूर महानगरपालिकेकडे देण्यात आलेली आहे. उक्त जमीन दोन संस्थेमध्ये विभागून देऊन त्याचा विकास वेगवेगळया प्रकारे करुन त्याचे व्यवस्थापन वेगवेगळया संस्थेने करणे हे एकत्रित व सुनियोजित विकासाच्या दृष्टीने सयुक्तिक होणार नाही. उक्त संपूर्ण ४४ एकर जागेचा एकत्रितपणे विकास केल्यास तो योग्यप्रकारे अधिक प्रभावी व सुनियोजित पद्धतीने

होवू शकेल. तसेच संपूर्ण जागेची देखभालही व्यवस्थितपणे होवू शकेल. महाराष्ट्र राज्य पर्यटन विकास महामंडळ मर्यादित यांनी दि.०६.०२.२०१७ च्या पत्रान्वये सूचित केल्यानुसार सदर संपूर्ण जागेचा एकत्रित सुनियोजित विकास साधल्यास अंबाझरी तलाव/उद्यान हे नागपूर शहरापुरतेच नव्हे, तर प्रादेशिक किंवा राज्य पातळीवर एक प्रमुख पर्यटनाचे आकर्षक केंद्र ठरु शकेल. या बाबी पाहता मौजा अंबाझरी, जिल्हा नागपूर येथील खसरा क्र. १ नगर भुमापन क्र. १ मधील ४४ एकर शासकीय जमिनीचा पर्यटनाच्या दृष्टीने सुनियोजित विकास होण्याकरिता सदर जमिनीचे व्यवस्थापन नागपूर महानगरपालिकेकडून परत घेवून, उक्त जमीन पर्यटन विकास व देखभालीकरीता महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित यांना महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ च्या कलम ३८ व ४० अन्वये शासनास प्राप्त अधिकारात, शासन परिपत्रक क्रमांकः-जमीन-०५/२०१४/प्र.क्र.८८/ज-१, दि.०२.०७.२०१४ नुसार ३० वर्षासाठी वार्षिक नाममात्र रू. १/- दराने भुईभाडे आकारुन, नियमित अटी व शर्तीवर भाडेपट्ट्याने देण्यात यावी व सदर भाडेपट्ट्याचे त्याच तत्वावर वेळोवेळी नुतनीकरण करण्याची तरतूद तसेच सदर प्रकल्पाद्वारे महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित यांना खर्च वजा जाता मिळणा-या निव्वळ वार्षिक उत्पन्नातील ५०% रक्कम, त्यांनी दरवर्षी शासनास जमा करण्याची अट भाडेपट्ट्यात अंतर्भूत करण्यात यावी व उक्त जमिनीचा विकास महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित यांचे मार्फत करण्यासाठी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित यांना उक्त जमिनीवरील आरक्षणाकरीता समुचित प्राधिकरण म्हणून घोषित करण्यासाठी महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ च्या कलम ३७ (१कक) अन्वये फेरबदलाची कार्यवाही नगर विकास विभागाकडून सत्वर करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती. ह्या संदर्भात दिनांक ३ जुलै, २०१७ रोजी मंत्रिमंडळ बैठकीत विचार विनिमय होऊन झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

## शासन निर्णयः-

०१. मौजा अंबाझरी, जिल्हा नागपूर येथील खसरा क्र. १ नगर भुमापन क्र. १ मधील ४४ एकर शासकीय जमिनीचा पर्यटनाच्या दृष्टीने सुनियोजित विकास होण्याकरिता सदर जमिनीचे व्यवस्थापन नागपूर महानगरपालिकेकडून परत घेवून, उक्त जमीन पर्यटन विकास व देखभालीकरीता महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित यांना महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ च्या कलम ३८ व ४० अन्वये शासनास प्राप्त अधिकारात, शासन परिपत्रक क्रमांकः-जमीन-०५/२०१४/प्र.क्र.८८/ज-१, दि.०२.०७.२०१४ नुसार ३० वर्षासाठी वार्षिक नाममात्र रू. १/- दराने भुईभाडे आकारुन, नियमित अटी व शर्तीवर भाडेपट्ट्याने देण्यास व सदर भाडेपट्ट्याचे त्याच तत्वावर वेळोवेळी नुतनीकरण करण्याची तरतूद तसेच सदर प्रकल्पाद्वारे महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित यांना खर्च वजा जाता मिळणा-या निव्वळ वार्षिक उत्पन्नातील ५०% रक्कम, त्यांनी दरवर्षी शासनास जमा करण्याची अट भाडेपट्ट्यात अंतर्भूत करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे :-

<u>अटी व शर्ती</u> :-

१) महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित यांना विकास व देखभाल करण्याच्या प्रयोजनाकरीता वार्षिक नाममात्र रुपये १/- या भुईभाड्याने मंजूर करण्यात आलेली सदर शासकीय जमीन किंवा तिचा कोणताही भाग (किंवा तिच्यातील कोणतेही हितसंबध) विक्री / देणगी देऊन / अदला बदल करुन / गहाण ठेऊन / पट्ट्याने देऊन / खाजगी-सार्वजनिक सहभाग तत्वावर किंवा बाह्य यंत्रणाद्वारे किंवा अन्य कोणत्याही प्रकारे शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय हस्तांतरित करता येणार नाही. सदर जमिनीवर अथवा त्याच्या कोणत्याही भागावर अन्य व्यक्ती/ संस्था/ कंपनी इत्यादींचे कोणत्याही प्रकारचे हक्क निर्माण होतील अशा प्रकारे कोणताही आर्थिक व्यवहार अर्जदारास करता येणार नाही. तसेच शासनाच्या महसूल विभागाच्या पूर्वमान्यतेशिवाय सदर जमीनीचे पोटविभाजन करता येणार नाही.

२) सदर प्रकल्पाद्वारे महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित यांना खर्च वजा जाता मिळणा-या निव्वळ वार्षिक उत्पन्नातील ५०% रक्कम, त्यांनी दरवर्षी शासनास जमा करण्याचे बंधनकारक राहील याबाबतची अट भाडेपट्ट्यात अंतर्भूत करण्यात यावी.

३) विषयांकित शासकीय जमीनीचा वापर केवळ मंजूर केलेल्या प्रयोजनासाठी करता येईल. अन्य कोणत्याही प्रयोजनासाठी सदर जमिनीचा अथवा त्याच्या कोणत्याही भागाचा तात्पुरता अथवा कायमस्वरुपी वापर करावयाचा झाल्यास त्यासाठी शासनाच्या महसूल व वन विभागाची पूर्वमान्यता आवश्यक राहील.

४) विषयांकित शासकीय जमिनीवर संबंधित नियोजन प्राधिकरणाच्या विहित परवानगीने व मंजुर विकास नियंत्रण नियमावलीनुसार विकास करणे बंधनकारक राहील. तसेच या व्यतिरिक्त आवश्यकतेप्रमाणे अन्य संबधित विभाग / शासकीय यंत्रणा यांची मान्यता / पूर्वपरवानगी / ना- हरकत घेणे देखील बंधनकारक राहील.

५) प्रस्तावित प्रयोजनाच्या व सुरक्षेच्या अनुषंगाने राज्य व केंद्र शासनाच्या विविध विभागांनी वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश / सूचना या प्रकरणी उक्त संस्थेस बंधनकारक राहतील व त्यानुषंगाने आवश्यक खबरदारी / काळजी घेणे बंधनकारक राहील.

६) सदर जमिनीचा ताबा मिळाल्यापासून तीन वर्षाच्या आत बांधकामास सुरूवात करणे बंधनकारक राहील. अन्यथा नियोजित वापर सुरू होईपर्यंत शासनाच्या प्रचलित धोरणानुसार पुढील कार्यवाही करण्यात येईल.

७) शासकीय जमीन मंजूरी संदर्भातील इतर नियमित अटी या ठिकाणी लागू राहतील.

८) सदर जमीन मंजूर करण्याबाबतच्या अटी व शर्तीचा भंग झाल्यास जमीन शासनाकडून परत घेण्यात येईल.

९) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर व जिल्हाधिकारी, नागपूर यांना आवश्यक वाटतील अशा अन्य अटी व शर्ती विहित करण्याची मुभा राहील.

०२. मौजा अंबाझरी, जिल्हा नागपूर येथील खसरा क्र. १ नगर भुमापन क्र. १ मधील ४४ एकर शासकीय जागेचे व्यवस्थापन नागपूर महानगरपालिकेकडून जिल्हाधिकारी, नागपूर यांनी परत घेऊन, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित यांना पर्यटन विकास व देखभालीकरीता सपूर्द करण्याची कार्यवाही करावी.

०३. उक्त जमिनीचा विकास महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित यांचे मार्फत करण्यासाठी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित यांना उक्त जमिनीवरील आरक्षणाकरीता समुचित प्राधिकरण म्हणून घोषित करण्यासाठी महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ च्या कलम ३७ (१कक) अन्वये फेरबदलाची कार्यवाही नगर विकास विभागाकडून सत्वर करण्यात यावी.

०४. सदर शासन निर्णय पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, नगर विकास विभाग-१ व नगर विकास विभाग-२ यांची सहमती/विचारविनिमय करुन तसेच वित्त विभागाशी विचारविनिमय करुन त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१४६/२०१७/व्यय-९ दि. १२.०५.२०१७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in. या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०१७०७२११५१००५८६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunil Deoram Agarkar

Digitally signed by Sunil Deoram Agarkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bd05f4fdbbb9ed343f1be2caf44a80e981a9aaaa980ed10ed0e2772dfcca67cc, cn=Sunil Deoram Agarkar
Date: 2017.07.21 20:06:04 +05'30'

**(सु.दे.आगरकर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४) मा. मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५) मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई -३२.
७) अप्पर मुख्य सचिव (वित्त विभाग) मंत्रालय, मुंबई -३२.
८) प्रधान सचिव (महसूल) यांचे विकाअ/स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई -३२.
९) प्रधान सचिव, (नगर विकास विभाग-१), मंत्रालय,मुंबई -३२.
१०) प्रधान सचिव, (नगर विकास विभाग-२), मंत्रालय,मुंबई -३२.
११) प्रधान सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
१२) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.

१३) जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१४) जिल्हाधिकारी, नागपूर.

१५) मा. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य,(१) मुंबई -३२.

१६) मा. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य,(२) नागपूर.

१७) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित, मादाम कामा रोड, मुंबई.

१८) नगर विकास विभाग (नवि-९/नवि-२६), मंत्रालय,मुंबई -४०० ०३२.

१९) वित्त विभाग (व्यय-९), मंत्रालय,मुंबई -४०० ०३२.

२०) सर्व सहसचिव/उपसचिव, महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

२१) निवडनस्ती, कार्यासन ज-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई -३२